वटसिद्ध नागनाथ यांचा जन्मवृतांत आणि त्यांच्या अंगभूत दैवी गुणांमुळे आणि पालनकर्त्यांच्या सुशील संस्कारांमुळे बालवयातच अन्य बालकांसोबत खेळत असतांना श्रीदत्त गुरूंनी सिद्धी त्यांच्या स्वाधीन केली. त्यानंतर कालपरत्वे त्यांना श्रीदत्तगुरूंच्या दर्शनाचे वेध लागले. त्यासाठी त्यांनी कोल्हापुरात एक भव्य अन्नछत्र उघडले. त्या माध्यमातून श्रीगुरु दत्तात्रेयां करीता असलेली पायपीट व शोधयात्राही संपली आणि ते अलगदपणे श्रीगुरूंच्या सान्निध्यात आले. नंतर श्रीदत्तांनी त्यांना बद्रिकेदार पर्वतावर नेऊन सर्व शस्त्रअस्त्र विद्या शिकवल्या. त्यानंतर नाथपंथीयांसाठी अत्यावश्यक नागश्वत्थ वृक्षांचा पूजाविधी त्याच्या कडून करवून घेतली आणि त्यांनी बारा वर्षांच्या उग्र तपश्चर्येसाठी बसवून ते पुनश्च गिरनार पर्वतावरील दत्ताश्रामात परतले. तपश्चर्या पूर्ण झाल्यानंतर श्रीदत्तात्रेयांनी त्यांना तीर्थयात्रे निमित्त भ्रमंती करण्यास सांगितले. नागनाथांनी, भ्रमंती करीत अगणित तीर्थस्थानांना भेटी दिल्या. मार्गात बाले घाटातील निसर्ग सौंदर्यावर लुब्ध होऊन त्यांनी तिथेच वस्ती केली. त्यांचे वास्तव्य तेथील लोकांना लाभदायक ठरले. त्यामुळे कळत नकळत त्यांचे प्रस्थ वाढले. मठाची निर्मिती झाली. शिष्यवृंद आणि भाविकांची इतकी गर्दी होऊ लागली की त्या स्थानाला तीर्थाचे स्वरूप आले. योगायोगाने मच्छिंद्रनाथ तीर्थयात्रेसाठी जात असतांना बाले घाटातच मुक्कामासाठी राहिले. गाकाऱ्यांच्या सांगण्यावरून आपणही नागनाथ महाराजांचे दर्शन घ्यावे असे त्यांना वाटले. ते दर्शनासाठी मठात गेले असतां द्वारपालासोबत त्यांची बाचाबाची झाली. त्याचे पर्यवसान या दोन तुल्यबळ नाथांच्या संघर्षात झाले. या संघर्षात वटसिद्ध नागनाथ वरचढ ठरले. हतबल होऊन भूमीवर कोसळलेल्या मच्छिंद्रनाथांचा श्रीगुरु दत्तात्रेयांच्या नावाने आक्रोश करता आहेत हे पाहून वटसिद्ध नागनाथांना उपरती झाली की हा तर आपल्या गुरुंचाच धावा करीत आहे, म्हणजे हा आपलाच गुरुबंधू आहे. गैरसमज दूर झाले. आणि दोघांचा मिलाप झाला. तर या वटसिद्ध नागनाथांची सिद्धी अशी होती की ते मृताला ही सजीव करीत. त्यांच्या या सिद्धीचा साक्षात उत्पत्तीकर्त्या ब्रम्हदेवालाही त्रास होऊ लागला होता. धर्मराज यमाने ब्रम्हदेवास विनंती केली आणि मग साक्षात ब्रम्हदेवाला भूतलावर येऊन वटसिद्ध नागनाथांची समजूत घालावी लागली होती. गत अध्यायातील विधीलिखित घटना क्रमानंतर पुढे काय घडणार याची उत्कंठा ही असतेच.

हिमालयाची कन्या म्हणून त्रैलोक्याला ज्ञात असणाऱ्या पार्वतीच्या विवाहाची तयारी अंतिम टप्प्यात आली आहे. दक्ष महाराजांचा राजवाडा अप्रतिम सजविण्यात आला आहे. पार्वतीने श्रीशंकरांना वरले होते. निमंत्रित देव, दानव आणि मानव यांच्या उपस्थितीने लग्नमंडप फुलांच्या ताटव्यांप्रमाणे बहरला आहे. व्यासपिठावर दक्ष, हरिहर यांच्यासह सन्मानीय पाहुणे आसनस्थ झाले आहेत. तारकांच्या समुहात चंद्रकोर जशी शोभायमान वाटते, तद्वत साजशृंगारांनी सजवलेली पार्वती मैत्रिणींच्या घोळक्यात हास्य विनोद करीत आहे. सौदामिनीसारखी तेजस्वी भासणारी जगन्माता सुंदर दिसत होती. अप्रतिम सौंदर्याचा मापदंडच! सृष्टीचे सारे लावण्य तिच्यामध्ये सामावले आहे, असे म्हणणे म्हणजे अतिशयोक्ती नक्कीच नाही. तिच्या दिव्य देहावर नजर स्थिर होत नव्हती. त्या लावण्यवतीच्या सौंदर्याने मोहित होऊन ब्रम्हदेवाची कामभावना चाळावली, कामविव्हल भावना अनावर झाल्याने त्यांचे लिंगेंद्रिय द्रवले आणि आसनाखाली पायाजवळ वीर्य पडले. ब्रम्हदेव फारच संकोचले आणि आजूबाजूस कुणाचे लक्ष नाही असे पाहून त्यांनी ते पायाच्या टाचेने रगडले. त्यामुळे पारा चिरडून त्याचे असंख्य अणूपरमाणु पसरावेत तसे ते छिन्नविछिन्न झाले. त्यातून पुढे साठ सहस्त्र वालरवील्य ऋषी निर्माण झाले. उर्वरित वीर्य भाग, सेवकांनी झाडतांना, केरकचऱ्यात जमा झाला. विवाह

सोहळ्यानंतर तिथे लाजाहोम करण्यात आला होता. त्याचे भस्म आणि निर्माल्यासोबत तो केरकचरा भगिरथी नदीच्या प्रवाहात सोडण्यात आला. पाण्यामुळे केरकचरा बाजूला होऊन वीर्य निर्मळ झाले. प्रवाहाबरोबर वाहत असतांना काठावरील गवतांमध्ये अडकले. पाण्याच्या तरंगांनी बाजूच्या भूमीवर जाऊन तिथेच राहिले. या घटनेला पुष्कळ काळ उलटून गेला. एक दिवस हरिणीचा कळप पाणी पिण्यासाठी नदीवर आला असताना एका हरिणीने नेमके त्या गवतातील विर्यावर मुत्र सोडले, त्या मूत्रात प्रकृती बीज होते. ब्रम्हबीज आणि प्रकृतीबीज यांचा संयोग होताच त्यामध्ये पिप्लायान नारायणाने संचार केला. स्वेदज सजीव वाढतात त्याप्रमाणे गर्भ वाढीस लागला. नऊ महिने, नऊ दिवसांनी पूर्ण वाढ झालेल्या बाळाने टाहो फोडला, नदीकाठच्या गवतात चिमुकला जीव हातपाय झाडात रडू लागला. योगायोगाने सत्यश्रवा नावाचा एक ब्राम्हण, दर्भ उपटण्यासाठी त्याठिकाणी आला. भूमीवर अवतरलेल्या तेजस्वी आणि गोंडस बाळाकडे त्याची दृष्टी गेली. तो मनाशी म्हणाला, “वाहवा!! अतिशय सुंदर रूप! अनंत मस्तकाचा शेषनाग आपल्या फाण्यावरील दिव्य नागमणी येथे विसरून गेला नाही ना? हे उर्वशीच्या उदरातील तेजःपुंज बाळकमळ तर नाही ना? किंवा एखाद्या जलदेवतेने कोण राजपुत्राला तर येथे आणून ठेवले नसेल? याची ओळख कशी पटणार? याची माता याला केव्हा भेटेल? माते शिवाय याचे काय होईल? अनेक प्रश्नांची आवर्तने त्याला त्रस्त करू लागली. या बाळाला हात लावू की नको! अशा द्विधा अवस्थेत, विचारचक्रात हरवून तो बाळाजवळ उभा आहे. हृदयात प्रेमाचा पाझर फुटला आहे. “या सुकुमार चिमुकल्याला निराधार अवस्थेत सोडून कसे जावे? या भयाण आणि निर्मनुष्य अरण्यातील श्वापदे पाण्यासाठी येतील, तेव्हा या बाळाचा फडशा पडतील. घात होईल!!” उभ्या उभ्याने त्याचे विचार सुरुच आहेत परंतु पुढे होऊन तो काही बाळाला उचलत नव्हता, मग अनेक तर्कवितर्कांने त्याच्या मनाला दोलायमान केले. “दुसरी काही भानगड नाही ना? काय सांगावे? अशा जंगलात नदीकाठी असे सुंदर बालक आलेच कसे? काही कळत नाही?” इवले इवले हातपाय नाचवीत कोवळ्या आवाजात बालकाचे रुदन सुरु आहे. अशा भांबावलेल्या मनस्थितीत सत्याश्रवा उभा असतानांच स्वर्गीय देवांनी पिप्पलायन नारायणाचा जयजयकार करीत नमन केले आणि भक्तिभावाने पुष्पवृष्टी केली. विविध रंगी, नाना आकाराची सुगंधी फुले टप् टप् करीत बाळाच्या आणि ब्राम्हणाच्या अंगावर पडून नदीकाठ भरून गेला. तो चमकून भानावर आला. पाठीवर आभाळ पडल्यासारखा टुणकन उडाला. मनाशी म्हणाला, “आपला तर्क बरोबर आहे. हे बालक नसून पिशाच्चलीला आहे. एवढा वेळ हे बालक एकटेच होते. आता फुलेही पडू लागली. आपणाभोवती सर्वबाजूंनी पिशाच्च घेराव करून आहेत की काय? भयभीत होऊन तो पळू लागला. कसले दर्भ काढायचे. धोतराचा सोगा हातात धरून त्याने थेट घरची वाट धरली. भेदरलेला सशा उड्या मारत पळतो तसा तो पळत होता. त्याची ती भयभीत अवस्था पाहून स्वर्गातील देव हसू लागले. हसतां हसतां त्यांनी देववाणी केली. “अरे सत्याश्रवा! पळू नकोस, उभा रहा.” तो आवाज ऐकून त्याने घाबरून उडी मारली. धोतरात पाय अडकून उलथून पडला आणि मोठ्याने किंचाळला, “मला खायला भूत आले भूत. हे बालक नाही! हे तर दिवसाढवल्या प्रकट झालेले प्राणघातक भूत आहे. अरे बापरे! राम, राम! राम!!” ताशावर काडी वाजवावी त्या वेगाने त्याचे पाय धावत होते. भूमीवर ठरत नव्हते. तो पडत होता, पुन्हा उठून पळत होता. जवळपास कुणीही नसतांना आवाज कुठून आला या संशयाने त्याला झपाटले होते. भूत असल्याबद्दल त्याची खात्रीच झाली. त्याला समजावण्याच्या नादात न पडता देव नारदाला म्हणाले, “मुनिवर! हा ब्राम्हण तर मुलखाचा घाबरट आहे. आणखी आकाशवाणी केली तर हा भयाने प्राण सोडील. तेव्हा तुम्हीच त्याला कसेतरी अडवावे आणि समजून सांगावे.” ते ऐकून ब्रम्हवीणाधारक त्वरित भूमीवर उतरले. मूळरूपाचा त्याग करून, ब्राम्हण वेषात त्याच्या पुढ्यात प्रकट झाले. सत्यश्रवा कासावीस होऊन पळत होता. डोक्यावरील शेंडी उडत होती. धोतराची शुद्ध

नव्हती. त्याला अडवून नारदमुनी म्हणाले, “अरे थांब! थांब!! छाती फुटेल, एवढा का पळतोस? इतका गर्भगळीत का झालास?” ब्राम्हणाला पाहून सत्यश्रवा सावरला आणि बोलू लागला, “काय सांगू भटजी! मरता मरता वाचलोय काळ आला होता पण वेळ आली नव्हती. दर्भासाठी नदीकाठी गेलो होतो. तेथे बालरूपात भूत दिसले. अहो, मी धाडसी म्हणून टिकलो, घाबरलो नाही परंतु नंतर असंख्य फुलांचा मारा सुरु झाला. बहुतेक तेथे अनेक भुते असावीत, म्हणून पळालो. पण ती भुते मात्र मला ‘पळू नकोस, पळू नकोस, उभा रहा!’ अस म्हणत माझा पाठलाग करू लागली. मी काही थांबलो नाही मागे वळूनसुद्धा पहिले नाही. पळत पळत येथपर्यंत आलो. मी खंबीर मनाचा म्हणून टिकलो, दुसऱ्या कोणाची हिम्मत झाली नसती.” नारदांनी धीर दिला आणि हाताला धरून वृक्ष छायेत नेऊन बसविले, “सत्याश्रवा! तू नदीकाठी कुशबेटांजवळ होतास तेव्हा पुशप्वृष्टी झाल्याचे मी सुद्धा पाहिले. ती फुले कुठून पडताहेत म्हणून मी आकाशात पहिले असतां मला असंख्य देवते दिसली. ती तुझे नाव पुकारीत होती. सत्यश्रवा तूच ना?” ब्राम्हणाच्या स्पष्टीकरणाने सत्यश्रवा सावरला होता. “होय! मीच सत्यश्रवा, माझे नाव घेऊनच ते हाका मारीत होते. ब्राम्हण पुन्हा सांगू लागला. “अरेरे! प्रत्यक्ष देव तुला हाका मारीत होते, भूत नव्हे. ती भूतचेष्टा नव्हती रे! तो दैवी बालक आहे. ब्रम्ह तेजापासून जन्मलेला तो पिप्पलायन नारायण आहे. त्याला घरी नेऊन त्याचे पालनपोषण केल्यास तुझे सर्व मनोरथ पूर्ण होतील. मी स्वतः माझ्या कानांनी आकाशवाणी ऐकली, पाहिली आहे. असत्य मानु नकोस. विश्वास ठेव.” सत्यश्रवाचा मात्र विश्वासच बसत नाही. तो विचारात पडला. स्वर्गीय देवांना माझे नाव कसे माहित असणार? हा सुद्धा भूतापैकी कशावरून नसेल? दचकून त्याने नारदाला पायापासून डोक्यापर्यंत न्याहाळले आणि सहज आकाशाकडे नजर टाकली. तेव्हा नारदाच्या कृपेमुळे त्याला असंख्य देव दिसले. हात जोडून तो म्हणाला, “ब्राम्हणदेवा आपण सत्य बोललात, मी सुद्धा देवदेवतांचा समुदाय पाहिला. तुम्ही जरा माझ्याबरोबर नदीकाठी चला आणि ते बालक उचलून माझ्या हातात द्या.” नारद ब्राम्हणाच्या रूपातच आहेत, ते म्हणाले, “ठीक आहे! चल तुझा भित्रेपणा अजून गेला नाही असच वाटते.” नारद त्यांच्यासोबत नदीवर गेले आणि बालकाला उचलून त्याच्याकडे दिले. त्याच्या मनाची खात्री पटून भिती नाहीशी झाली. आनंदीत होऊन बाळाला छातीशी धरले, त्याला नारद म्हणाले, “सत्यश्रवा! या बालकाचे नाव ‘चरपट’ असे ठेवण्याची देववाणी मी ऐकली आहे.” मग तेथून ते निघाले. नारद स्वस्थानी गेले आणि सत्यश्रवा बालकासह गावाकडे निघाला.

सत्यश्रवा आपल्या वाड्यात गेला. त्याची चंद्रा नामक पत्नी लक्ष्मी सारखी सुंदर, पतिव्रता गृहिणी होती. अनेक व्रतवैकल्ये करणारी प्रती अनुसुयाच म्हणावी अशी भाविक होती. तिला साद घालीत सत्यश्रवा म्हणाला, “चंद्रा! हे बघ, दर्भ आणण्यासाठी गेलो असतांना दैवकृपेने पुत्र प्राप्त झाला. याचे नाव ‘चरपट’ असे ठेवण्याची देववाणी झाली. त्याच्या पायगुणांमुळे मला देवतांचे दर्शन सुद्धा घडले आहे.” मग त्याने सकल कथेचे निवेदन केले. सत्यश्रवाच्या पत्नीलासुद्धा अतिशय आनंद झाला. चर्पटीला जवळ घेत ती म्हणाली, “स्वामी, या पुत्राच्या रूपाने आपल्याला वंशाचा दिवा प्राप्त झाला. आपण फार भाग्यशाली आहोत. खापराचे तुकडे वेचता वेचता चिंतामणी सापडावा, भुताची पूजा करण्यासाठी जाताना रस्त्यात लक्ष्मी भेटावी, दगड उचलायला जावे आणि त्याखाली परीस सापडावा किंवा माकडे धरीत असतांना हातात साक्षात अंजनीसुत हनुमान हातात यावा, तसा हा बाळ आपणाला सापडला आहे.’ असे म्हणत ती बाळाचे लाड, कोडकौतुक करू लागली. स्नान घालून स्तनपान करविले आणि पाळण्यांत घालून अंगाई गात ‘चर्पट’ हे नाव ओव्यात गुंफू लागली. पिप्पलायन नारायणाला ‘चर्पट’ नावाने आता भूतलावर जगद् उद्धाराचे कार्य करावे लागणार आहे.

सत्यश्रवाच्या संस्कारक्षम घरात चर्पट आता सात वर्षांचा झाला. त्याचा मौजीबंधन समारंभ मोठ्या धामधुमीत साजरा झाला. सत्यश्रवाने त्याला वेदशास्त्रनिपुण केले. व्याकरणशास्त्र, न्यायशास्त्राचे धडे दिले. वयाच्या बाराव्या वर्षीच चर्पटी सकल विद्या पारंगत झाला. एक दिवस महामुनी नारद सहज भ्रमण करीत तेथे आले. गुप्त वेष घेऊन महा तेजस्वी चर्पटीला डोळे भरून पहिले. श्रीनारद हे ब्रम्हदेव पुत्र आहेत. चर्पटी हा सुद्धा ब्रम्ह रेतापासून जन्माला असल्याने त्यांचा तो कनिष्ठ बंधू लागत होता, म्हणून त्याचे बंधूप्रेम उचंबळून आले होते. संतुष्ट होऊन ते बद्रीकाश्रमात गेले. तेथे अगोदरच श्रीदत्तगुरु आणि मच्छिंद्रनाथ जती बसले होते. त्यांची योगायोगाने भेट झाली. त्यांना वंदन करून नारद बसले. भगवान श्रीशंकरसुद्धा प्रकट झाले. चौघेही एकापेक्षा एक वरचढ ज्ञानी, तपस्वी, संन्यासी आणि प्रतापी होते. प्रत्येकजण आपआपल्या ठिकाणी समर्थ होता. संभाषणाच्या ओघात नारदांनी चर्पटीचा वृतांत कथन केला, त्यावर आदिनाथ म्हणाले, “दत्तात्रेया! नऊ नारायणांना सनाथ करून नाथपंथ स्थापण्याचा आपला संकल्प असून, नववा पिप्पलायन नारायण ‘चर्पटी’ या नावाने अवतरला असल्याने त्याला सनाथ करावे.” त्यावर दत्तात्रेय म्हणाले, “भगवान आदिनाथा! आपण योग्य तेच कथन केले आहे पण पश्चातापाशिवाय वैराग्य येत नाही आणि त्याशिवाय योग मार्गातील हित काही कळत नाही, तोपर्यंत उपचार म्हणून अनुग्रह देणे अप्रस्तुत आहे.” यावर नारदमुनी म्हणाले, “अवधूतां! चर्पटीच्या अंतःकरणात पश्चाताप निर्मिती करून वैराग्याकडे झुकविण्याचे काम माझ्यावर सोडा. त्यापुढील कार्य आपण करावे.” असे म्हणून सर्वांच्या संमतीने नारद गुप्त होऊन निघून गेले,

नारदमुनी भूतलावरच सत्यश्रवा ब्राम्हणाच्या घरी किशोरवयीन रुपात प्रकट झाले. तिथे श्रीनारदांनी विनंती केली, “गुरुवर्य सत्यश्रवा! मी कुलंब नामक ब्राम्हण किशोर आपल्या आश्रयाने विद्याभ्यास करू इच्छित आहे. मजवर दया करून मला ज्ञानदान करावे.” सत्यश्रवाने त्याच्या विनंतीचा तत्क्षणी स्वीकार करीत त्याला होकार दिला आणि कुलंबाला विद्यार्थी म्हणून आपल्या घरी ठेवून घेतले. आता चर्पटी आणि कुलंब एकत्रपणे विद्याभ्यास करतां करतां एकमेकांचे जिवलग मित्र झाले. अनेक दिवस नारद योग्य संधीची वाट पाहत होते पण त्यांना संधी मिळत नव्हती. अखेर एक दिवस योग जुळून आला. त्या गावातील एका प्रतिष्ठीताकडे ओटीभरणाचा कार्यक्रम होता. तेव्हा त्यांनी पूजाविधी करण्यासाठी सत्यश्रवास पाचारण केले कारण सत्यश्रवा हा त्या गावचा ग्रामजोशी होता पण घरातच पुजाव्रात असल्याने त्याने चर्पटीला त्या आसामीकडे पाठविले, त्याच्या सोबत कुलंबही गेला. चर्पटीने यजमानगृही जाऊन विधिवत् पूजा संपन्न केली. यजमान दक्षिणा घेउन आला असतांना कुलंबाने मोका साधला, तो चर्पटीला हळूच म्हणाला, “चर्पटी, तू दक्षिणा घेऊ नकोस, कारण दक्षिणा घेणे हे गुरुजींचे काम आहे. किती दक्षिणा घ्यावी याचे आपल्याला ज्ञान नाही. कमी जास्त होण्याची शक्यता आहे. आपण दोघेही अनभिज्ञ आहोत. हा निर्णय आपण गुरुंवरच सोडून देऊ या. ते येऊन दक्षिणा नेतील.” चर्पटी म्हणाला, “तुझे म्हणणे बरोबर आहे परंतु घरी रिकाम्या हाती कसे जायचे!” त्यावर कुलंबाचा युक्तिवाद असा की, “तू घेतलेली दक्षिणा कमी वाटून तुझ्या पित्याने मान्य केली नाही तर काय करशील? सर्व कष्ट पाण्यात जातील.” एवढ्यांत यजमानाने दक्षिणा हातात कोंबलीच, ती अर्थात फारच थोडी होती. केलेल्या कष्टाच्या मनाने ती अल्प दक्षिणा पाहून चर्पटी मनातून उदास झाला. कुलंबाने अगोदरच मनात विकल्प निर्माण करून त्याची दोलायमान अवस्था करून ठेवली होती. पित्याचीही भिती घातली होती. तो अत्यल्प मोबदला पाहून चर्पटी त्यांच्यावर रागावला, “यजमानजी! किती दक्षिणा द्यावी आणि किती नाही याचा विचार करा. कार्य किती मोठे, दक्षिणा किती अल्प? आपणास काही कळते की नाही? आमचा अवमान करता काय? वादाला प्रारंभ झाला. यजमान म्हणाला, “ऐकून

घे भटा! याचकाला मोठ्या दानाची अपेक्षा असते पण दुर्दैवाने दाताच जर करंटा असेल तर काय करावे? आहे तेवढ्यात संतुष्ट होता येत नाही काय? चर्पटी इरेला पडला, “अरे तुझी ऐपत नाही तर कशाला कार्य काढलेस? आम्ही आग्रह केला होता काय?” त्यांची बाचाबाची होऊन शब्दांनी शब्द वाढला आणि कलहाने उग्र रूप धारण केले. भांडणाचा भडका उडालेला पाहून कुलंबाने काढता पाय घेतला आणि पळत घरी जाऊन सत्यश्रवाला सांगितले, “गुरुजी! चर्पटाने नाहक भांडण करून गुणी यजमानांचा अपमान करून त्यांना दुखविले. सर्वजण आपणांसच लोभी आणि असंतुष्ट ब्राम्हण म्हणून दूषण देऊ लागले आहेत. आपली मोठी अपकीर्ती झाली आहे, काही धडगत दिसत नाही.” हे ऐकून भटजी खवळला. देवपूजा तशीच अर्धवट सोडून दणादणा पाऊले आपटीत यजमानांच्या घरी जाऊन पाहतो तर कलह चांगलाच पेटला होता. त्यांची ती वादावादी ऐकून पिसाळलेल्या सत्यश्रवाने खाड्कन चर्पटीच्या कानाखाली आवाज काढला. समोर यजमान भांडत असतांना पित्यानेही त्यांचाच पक्ष धरून सर्वांसमोर कानशिलात फटका दिल्यामुळे चर्पटीला भयंकर राग आला. हातातले सर्व तेथेच टाकून तो निघून गेला. गावाबाहेरील दुर्गाभगवतीच्या मंदिरात जाऊन रडत बसला. दुःखाने अंतःकरण विदीर्ण झाले होते. नारदमुनींच्या एकपात्री नाटकाचा दुसरा प्रवेश सुरु झाला. सर्वज्ञानी नारदमुनी एका तपस्वी ब्राम्हण पंडिताचा वेष धारण करून, दर्शनाच्या निमित्ताने दुर्गा मंदिरात आले. दुर्गामातेला नमन करून चर्पटीजवळ बसत त्यांनी विषयाला सुरवात केली, “काय छोटे भटजी! आपण इथे एकटेच कसे? चिंताग्रस्त होऊन का बसला आहात?” कुणीतरी आपली आस्थेने विचारपूस करीत आहे त्यामुळे भारावलेल्या मनस्थितीत स्वतःचे मन मोकळे करण्यासाठी चर्पटीने इत्यंभूत हकीकत सांगितली. ती ऐकून नारद म्हणाले, “अरेरे! ब्राम्हण पिसाट झाला. अशा गुणी पुत्राला सर्वांसमोर अपमानित केले, हे बरे केले नाही. आपले पादत्राण पुत्राच्या पायी येऊ लागल्यानंतर, पुत्र जाणतां झाला असे समजून त्याचा आदर राखला पाहिजे. तशी जगाची पद्धत आहे. जाणत्या पुत्राचा उपमर्द करणारा वृद्ध सत्यश्रवा बुद्धी भ्रष्टच म्हटला पाहिजे. असल्या भ्रमिष्टाचे पुन्हा तोंडसुद्धा पाहू नये. स्वाभिमानी पुत्राने अरण्यात निघून जावे, परंतु असल्या विक्षिप्त पित्यास शरण जाऊ नये.” नारदमुनींच्या बोलांनी चर्पटीच्या क्रोधाग्नीत ज्वालाग्राही तेलाची भरच पडली. थोडक्यात भटजी पंडित योग्य सल्ला देत आहेत. याची खात्रीच झाली. तो पंडितांना म्हणाला, “महाराज, माझ्या घरी गुपचूपपणे जाऊन कुलंब नावाच्या माझ्या मित्राला बोलावून आणावे. मग आम्ही दोघे दूरदेशी जाऊन कोणातरी सद्गुरूजवळ जाऊन अध्यन पूर्ण करू.” नारदांनी ह्या कामाची शाश्वती दिली आणि कुलंबाला निरोप सांग्यासाठी ते निघून गेले. काही वेळाने कुलांबाच्या भूमिकेत पुन्हा मंदिरात आले. कुलंब म्हणाला, “चर्पटी, त्या ब्राम्हणाचे डोके फिरले आहे. क्रोधाच्या आहारी जाऊन त्याचे मानसिक संतुलन बिघडून गेले आहे. आपण त्याच्याजवळ न राहणेच योग्य! दुसरा कुणीतरी चांगला गुरु शोधून त्याच्या करवी विद्या अभ्यास करू या.”

कुलंबाचेही तेच मत ऐकून चर्पटीचा विचार पक्का झाला, तो म्हणाला, “गड्या आपण दोघे मित्र; विद्यार्थी असल्याने एकत्र राहून आपला विद्या अध्ययनाचा हेतू साध्य करू या. आपण एकत्र राहिल्यास दुःखाची तीव्रता जाणवणार नाही.” कुलंबानेही, “अवश्य! चर्पटी, हा कुलंब तुझी साथ सोडणार नाही. चल आता त्वरेने निघू या.” असं म्हणत दोघे तत्काळ उठले. पाहतां पाहतां पांच कोस अंतर चालून गेले. गावच्या सर्व खाणाखुणा दृष्टीआड झाल्या होत्या. कुलंब म्हणाला, “मित्रा चर्पटी! आपण बद्रिकाश्रमात जाऊन श्री बद्रीकेदाराचे दर्शन घेऊ. मग काशी क्षेत्री जाऊ. तिथे अनेकानेक विद्वानांचे वास्तव्य असल्याचे ऐकले आहे. त्यापैकी जो आपणास योग्य वाटेल त्याच्याकडे राहून अध्ययन करू या.”

कुलंबाच्या विचारांना पुष्टी देण्यासाठी चर्पटी 'अवश्य' म्हणाला. दोघेही पाऊले उचलत बद्रिकाश्रम गाठण्यासाठी उत्सुक झाले होते.

शेवटी एकदाचे तेथे पोहोचले. उभयतांनी मनोभावे श्रीबद्रीकेदाराचे दर्शन घेतले. तेवढ्यात श्रीदत्त आणि जती मच्छिंद्रनाथ तेथे आले. कुलंब वेषधारक नारदमुनींनी त्या उभयतांना नमस्कार केला. चर्पटीनेही कुलंबाचे अनुकरण केले. त्याने "हे दोन महायोगी कोण आहेत?' असे विचारले. तेव्हा कुलंब म्हणतो, "चर्पटी! तुला त्यांना ओळखता येते का पहा बरे. अरे हे गुरुदेव दत्त आहेत आणि हे त्यांचे शिष्य मच्छिंद्रनाथ आहेत. त्यांची नावे तू कधीकाळी ऐकली आहेस. तेच हे थोर महापुरुष आहेत आणि मी स्वतः कुलंब नामधारक देवऋषी नारद आहे. तुझे कल्याण करण्यासाठीच मी मानव वेष धारण केला आहे." ते ऐकून चर्पटीने नारदांच्या पायांवर माथा ठेवून वंदन केले, हात जोडून तो म्हणाला, "देवर्षी, आपण सर्वांनी स्वरूप दर्शन देऊन माझे कल्याण करावे." "चर्पटी! आम्ही तिघेही तुला स्वरूप दाखवू परंतु गुरुप्रसादा विना तुला ते पाहता येणार नाही. गुरुमंत्र प्रसाद मिळाल्यानंतर आम्हीच काय परंतु त्रिभुवनाचे ब्रम्हस्वरूप तू पाहू शकशील आणि त्यांत स्वतःही एकरूप होऊन जाशील." चर्पटी नम्रतेने म्हणाला, "महाराज! आपणां पेक्षा दुसरा श्रेष्ठ गुरु कोण आहे? आपण त्रिभुवनाचे सर्वश्रेष्ठ असल्याने मला अनुग्रह देऊन सनाथ करावे." यावर श्री नारद गुरुदत्तांना म्हणाले, "दत्तमहाराज! हा घ्या आपला चर्पटी सांभाळ याला. आपला हेतू साध्य करून द्यावयाचे माझे कार्य पूर्ण झाले आहे." गुरुदेव दत्तांनी चर्पटीच्या माथ्यावर वरदहस्त ठेवला. कानात मंत्र सांगून त्यांस सज्ञान केले. अज्ञान काजळीची पुटे झडून गेली. सर्व चराचर ब्रम्ह स्वरूपाने ओतप्रोत भरल्याचे दिसून आले. श्री दत्त, श्री नारद, श्री मच्छिंद्र त्याला मूळ स्वरूपात दिसू लागले. ते तीन तेजोसूर्य पाहून त्याला गहिवरून आले. त्यांच्या चरणांवर माथा ठेवून त्याने वंदन केले. तो क्षण साधून श्रीशिव तिथे प्रकट झाले. तेव्हा जती मच्छिंद्र म्हणाले, "चर्पटी, हे पहा, तुला भेटण्यासाठी साक्षात भगवान श्रीशिव आले आहेत. त्यांचे आशीर्वाद घे." चर्पटीने श्रीशिवाच्या चरणांवर लोटांगण घातले. त्यांनी त्याला मिठीत घेतले, मुख कुरवाळले, म्हणाले, "दत्तात्रेया, आतां चर्पटीला विद्या निपुण करावे." त्यानुसार श्री दत्तगुरूंनी चर्पटीला सर्व विद्या पारंगत केले व सफलतेचा वर प्राप्त करून दिला. त्यानंतर श्री दत्त गिरनार पर्वतावरील आश्रमात वास्तव्यासाठी गेले.

श्री चर्पटीनाथ तीर्थाटनासाठी निघाले. रामेश्वर, गोकर्ण, महाबळेश्वर, जगन्नाथ, हरिहरेश्वर, काशी, मनकर्णिका, विश्वेश्वर अशी अपरिमीत तीर्थे भ्रमंती केली. पुढे त्यांनी नऊ शिष्य तयार करून त्यांना सर्व सिद्धकला शिकविल्या. त्यांची चौऱ्याऐंशी सिद्धांत गणना झाली.

फलश्रुती: या अध्यायाच्या पठणाने नवज्वर बरे होतील. मधुमेह आणि हिवताप यांचा प्रतिकार करता येईल.